सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (रामदास आठवले मागासवर्गीय कापूस उत्पादक सहकारी सूतगिरणी मर्या, दिग्रस, जि.यवमताळ सूतगिरणीस भागभांडवल) या योजनेकरिता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत.
(लेखाशिर्ष ४४२५२२२३)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ३० मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ व दि.०४.०३.२०२४
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाची नस्ती क्र.शाभाभा-१११७/प्र.क्र.८९/टेक्स-१(अ)

**शासन निर्णय :-**

सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) या योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-४, ४४२५, सहकारावरील भांडवली खर्च, ००, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणका, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०१) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४४२५२२२३) या लेखाशिर्षाखाली रु.१६९००.०० लाख इतका नियतव्यय अर्थसंकल्पीत असून सुधारित अंदाजान्वये रु.११२४५.५० लाख इतका निधी उपलब्ध आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ व दि.०४.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान या योजनेअंतर्गत रामदास आठवले मागासवर्गीय कापूस उत्पादक सहकारी सूतगिरणी मर्या, दिग्रस, जि.यवमताळ सूतगिरणीस शासकीय भागभांडवल मंजूर करण्यासाठी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने वाचा क्र.२ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार तसेच वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार (०१) (०१) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४४२५२२२३) या लेखाशिर्षाखाली रु.४६५.४८ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ व दि.०४.०३.२०२४ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ व दि.०४.०३.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.३७९/२०२४/व्यय-१४, दि२८.३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४०३१६४२५१७०२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.04.03 16:52:07 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) आयुक्त, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर
४) प्रादेशिक उप आयुक्त, (समाजकल्याण), अमरावती (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (टेक्स-१(अ), मंत्रालय, मुंबई
९) अध्यक्ष, रामदास आठवले मागासवर्गीय कापूस उत्पादक सहकारी सूतगिरणी मर्या, दिग्रस, जि.यवमताळ
१०) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग